सन २०१९-२० करिता कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने) कुंडल (कार्यक्रम) (२४१५-१०६८) करिता निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्र. वनबां-२०१९/प्र.क्र.१६१/फ-९**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक :- २३ ऑक्टोबर, २०१९

वाचा :-

१. प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष- १/पी/चाबाप्र/प्र.क्र.३९/६८/२०१९-२०, दिनांक २४.०४.२०१९
२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक:वनबां-२०१९/प्र.क्र.१६१/फ-९, दि.२६.०४.२०१९
३. प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष- १/पी/चाबाप्र/प्र.क्र.३९/२६०/२०१९-२०, दिनांक २७.०५.२०१९
४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक:वनबां-२०१९/प्र.क्र.१६१/फ-९, दि.३१.०५.२०१९
५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि. ०८.०७.२०१९

प्रस्तावना :-

कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने) याचे करीता सन २०१९-२० या वर्षामध्ये कुंडल येथे वन प्रशिक्षण केंद्राची स्थापना करणे (२४१५ १०६८) या लेखाशिर्षाअंतर्गत ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) उपशिर्षाकरिता रु.२५०.०० लक्ष व ३६- सहाय्यक अनुदाने (वेतन) या उपशिर्षाकरिता रुपये २५०.०० लक्ष असे एकूण रु.५००.०० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करुन दिलेला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.५ च्या परिपत्रकान्वये वित्तीय वर्ष २०१९-२० च्या अर्थसंकल्पीय तरतूदींची मासिक निधी विवरणपत्रे अर्थसंकल्प अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर (BEAMS) प्रशासकीय विभागांकडून नोंदविण्यात आल्यानंतर सन २०१९-२० च्या प्रथम नऊ माहीकरीता (डिसेंबर,२०१९ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६० टक्केच्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज नियंत्रण व संनियंत्रण प्रणालीद्वारे वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

अर्थसंकल्पीत निधीच्या अनुषंगाने प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर त्यांचेकडून संदर्भ क्र. १ व ३ अन्वये कुंडल येथे वन प्रशिक्षण केंद्राची स्थापना करणे (२४१५ १०६८) या योजनेंतर्गत ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) करीता रु.२६९.४१ लक्ष व ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) करिता रु.२५०.०० लक्ष इतका निधी उपलब्ध करुन देण्याबाबतचे प्रस्ताव प्राप्त झाले. त्यानुसार संदर्भ क्र.२ अन्वये ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) करीता रु.८३.३३ लक्ष व संदर्भ क्र.४ अन्वये ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) रु.८३.३३ लक्ष असा एकूण रु.१६६.६६ लक्ष इतका निधी वितरित करण्यात आला आहे. आता वित्त विभागाच्या संदर्भ क्र.५ च्या परिपत्रकानुसार ६० टक्केच्या मर्यादेत निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यानी संदर्भ क्र.१ व ३ नुसार सादर केलेला प्रस्ताव व वित्त विभागाच्या संदर्भ क्र.५ येथील परिपत्रक विचारात घेता प्रस्तावातंर्गत मागणी लक्षात घेऊन कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने) याचे करीता कुंडल येथे वन प्रशिक्षण केंद्राची स्थापना करणे (२४१५ १०६८) या लेखाशिर्षाअंतर्गत अर्थसंकल्पीत निधीच्या मर्यादेत **३६-सहाय्यक अनुदाने रु.६६.६७ लक्ष व ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) रु.६६.६७ लक्ष असा एकूण रु.१३३.३४ लक्ष** इतका निधी खालील विहीत केलेल्या अटी व शर्तीस अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे.
२. उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.
३. नियंत्रक अधिकाऱ्यांना सूचित करण्यात येते की, एकूण वितरीत केलेल्या/करण्यात येणाऱ्या तरतूदीपेक्षा कोणत्याही परिस्थितीत अतिरिक्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.
४. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.
५. संस्थेने आर्थिक वर्ष २०१९-२० मध्ये मंजूर व वितरीत अनुदानाच्या मर्यादेत खर्च सिमित ठेवावा.
६. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.
७. संस्थेने मागील वर्षाकरिता त्यांना उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखापालांना तात्काळ सादर करावे. त्याचप्रमाणे, आता वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशिलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र देखिल (Utilization Certificate) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२ नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.
८. उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरीता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.
९. प्रत्यक्ष खर्च करण्यापूर्वी विहीत पध्दतीचे पालन करावे व आवश्यकतेनुसार आहरण करावे.
१०. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक ०८.०९.२०१९ चे परिपत्रकातील अटींची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.
११. सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

सदर योजनेवर होणारा खर्च मागणी क्र.सी-७ प्रधान शिर्ष- २४१५- कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०६-वनीकरण, २७७-शिक्षण (००) (०२) कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने) कुंडल (कार्यक्रम) ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) व ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२४१५-१०६८) या लेखाशिर्षा अंतर्गत सन २०१९-२० मध्ये मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक ०८.०९.२०१९ च्या परिपत्रकान्वये तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०२३१६०४४३७६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUJAY DEORAO DODAL

Digitally signed by SUJAY DEORAO DODAL
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=a6a471816b9dbfd727f2e5ec4825f4678c8393d846acd1c16b8936c8b3a519c6, ou=REVENUE AND FOREST, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SUJAY DEORAO DODAL
Date: 2019.10.23 16:06:54 +05'30'

**( सुजय दोडल )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
४. मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. महासंचालक, कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने), कुंडल.
६. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. सह सचिव/उपसचिव,वित्त विभाग (अर्थ-३)/(व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.
८. उप सचिव, नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
९. कार्यासन अधिकारी, फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)